**महाराष्ट्र अभियांत्रिकी (यांत्रिकी) सेवा परिक्षा २०२१ मधील सहायक अभियंता श्रेणी-२ (यांत्रिकी) गट-ब या पदावर रुजु न झालेल्या उमेदवारांची नियुक्ती रद्द करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः नियुक्ती २०२३ /प्र.क्र. ९५ (३) (भाग-९)/आ(स.अ.श्रे-२)**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड,
३ रा मजला,जलसंपदा विभाग, मंत्रालय,मुंबई-४०० ०३२.
दिनांक : १० जून, २०२४

संदर्भ : जलसंपदा विभाग, शा. नि. क्र. नियुक्ती-२०२३/प्र.क्र.९५(१)/आ(स.अ.श्रे-२), दि.२६.०२.२०२४

**शासन निर्णय :-**

महाराष्ट्र अभियांत्रिकी (यांत्रिकी) सेवा मुख्य परीक्षा २०२१ च्या अंतिम निकालाच्या आधारे महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने जलसंपदा विभागातील सहायक अभियंता श्रेणी-२ (यांत्रिकी) या गट-ब पदांकरिता शिफारस केलेल्या ७६ उमेदवारांपैकी नियुक्तीसाठी पात्र असलेल्या ७४ उमेदवारांची संदर्भाधीन शासन निर्णयान्वये सहायक अभियंता श्रेणी-२ (यांत्रिकी) गट-ब या पदावर जलसंपदा विभागात ते ज्या दिवशी रूजू होतील त्या दिनांकापासून दोन वर्षांच्या परिवीक्षाधीन कालावधीसाठी विहित अटी व शर्तींच्या अधीन राहून तात्पुरती नियुक्ती करण्यात आली होती.

२. संदर्भाधीन शासन निर्णयामधील परिच्छेद क्र. ३(२) अन्वये "परिविक्षाधीन उमेदवारांनी त्यांच्या नावासमोर दर्शविलेल्या ठिकाणी आदेशाच्या दिनांकापासून ३० दिवसांच्या आत तात्काळ रूजू व्हावे. सदर विहीत कालावधीत उमेदवार रूजू झाला/ झाली नाही तर तो/ती नोकरीची संधी गमावेल व त्याच्या नियुक्तीकरिता विचार करण्यात येणार नाही. ते सदर पदासाठी इच्छुक नाहीत, असे गृहीत धरण्यात येईल व त्यांचे नियुक्तीचे आदेश आपोआप रद्द होतील." अशी तरतूद करण्यात आलेली आहे.

३. संदर्भाधीन शासन निर्णयान्वये नियुक्ती दिलेल्या ७४ उमेदवारांपैकी, सोबतच्या "परिशिष्ट अ" मधील नमूद ६ उमेदवार हे रूजू होण्यास दिलेल्या विहित कालावधीमध्ये (नियुक्ती आदेशाच्या दिनांकापासून ३० दिवसांच्या आत/ रूजू होण्यास अंतिम मुदतवाढ दिलेल्या दिनांकापर्यंत) त्यांना पदस्थापना दिलेल्या ठिकाणी रूजू झालेले नाहीत. यास्तव, सोबतच्या "परिशिष्ट अ" मधील नमूद ०६ उमेदवारांची संदर्भाधीन शासन निर्णयान्वये सहायक अभियंता श्रेणी-२ (यांत्रिकी) गट-ब या पदावर करण्यात आलेली तात्पुरती नियुक्ती या शासन निर्णयान्वये रद्द करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०६१०१७४८१७८६२७ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

ANIL VITTHAL DEOKATE

Digitally signed by ANIL VITTHAL DEOKATE
DN: CN = ANIL VITTHAL DEOKATE, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = WATER RESOURCES DEPARTMENT
Date: 2024.06.10 18:01:49 +05'30'

**(अनिल वि.देवकाते)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

संबंधित उमेदवार यांना ई-मेल संदेशाद्वारे.

**प्रत :-**

१. अ.मु.स. (जलसंपदा), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
२. सचिव, मा.उपमुख्यमंत्री (जलसंपदा) यांचे कार्यालय, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
३. सचिव (लाक्षेवि), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
४. सचिव (प्रकल्प समन्वय), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
५. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग (पत्राने)
६. महासंचालक, संकल्पन, प्रशिक्षण व संशोधन, महाराष्ट्र अभियांत्रिकी संशोधन संस्था, नाशिक.
७. मुख्य अभियंता (यांत्रिकी),जलसंपदा विभाग, नाशिक.
८. मुख्य अभियंता ,सा. बां. प्रा.वि.,पुणे/नागपूर/नाशिक/अमरावती/छत्रपती संभाजीनगर.
९. महालेखापाल-१/२, लेखा व अनुज्ञेयता, महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर.
१०. महालेखापाल-१/२, लेखा परीक्षा, महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर.
११. संचालक, लेखा व कोषागारे, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
१२. उप सचिव (सेवा)/(प्रशासन), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३. कक्ष अधिकारी, कार्यासन (आ(संनि)/आ(वर्ग-२)/गोपनीय/नोंदणी शाखा, जलसंपदा विभाग,मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
१४. संग्रहार्थ/कार्यासन आ(स.अ. श्रे-२)

जलसंपदा विभाग, शासन निर्णय क्रमांक : नियुक्ती २०२३/प्र.क्र. ९५(३) (भाग-९)/आ (स.अ.श्रे.२), दिनांक १० जुन, २०२४ सोबतचे

"परिशिष्ट -अ"

| अ. क्र. | मलोआ गुणवत्ता क्रमांक | उमेदवाराचे नांव | उमेदवाराचा मुळ प्रवर्ग | म.लो.आ. शिफारस प्रवर्ग | सविस्तर पदस्थापना |
|---|---|---|---|---|---|
| १ | २/२०२१ | श्री. लडकत अक्षय पोपट | इमाव | खुला | मुख्य अभियंता (यांत्रिकी), जलसंपदा विभाग, नाशिक अंतर्गत पुणे महसूल विभागातील अधीक्षक अभियंता,यांत्रिकी मंडळ,कोल्हापुर अंतर्गत कार्यकारी अभियंता, यांत्रिकी विभाग,सातारा अंतर्गत उपअभियंता, यांत्रिकी उपविभाग, कोयनानगर |
| २ | ८/२०२१ | श्री. विशाल विष्णू भगरे | आदुघ | खुला | मुख्य अभियंता (यांत्रिकी), जलसंपदा विभाग, नाशिक अंतर्गत पुणे महसूल विभागातील अधीक्षक अभियंता,यांत्रिकी मंडळ,कोल्हापुर अंतर्गत कार्यकारी अभियंता, यांत्रिकी विभाग,कोल्हापुर अंतर्गत उपअभियंता, प्रादेशिक कर्मशाळा उपविभाग क्र.२ कोल्हापुर |
| ३ | २७/२०२१ | श्री. कोरे शैलेश श्रीरंग | इमाव खेळाडू | खुला खेळाडू | मुख्य अभियंता (यांत्रिकी), जलसंपदा विभाग, नाशिक अंतर्गत पुणे महसूल विभागातील अधीक्षक अभियंता,यांत्रिकी मंडळ,कोल्हापुर अंतर्गत कार्यकारी अभियंता, यांत्रिकी विभाग,सातारा अंतर्गत उपअभियंता, यांत्रिकी उपविभाग, कोयनानगर |
| ४ | ४३/२०२१ | श्रीमती माजगांवकर ऋतुजा अरुण | खुला महिला | खुला महिला | मुख्य अभियंता (यांत्रिकी), जलसंपदा विभाग, नाशिक अंतर्गत नागपूर महसूल विभागातील अधीक्षक अभियंता,यांत्रिकी मंडळ,नागपूर अंतर्गत कार्यकारी अभियंता ,प्रमुख द्वार उभारणी पथक क्र.२ नागपूर अंतर्गत उपअभियंता,द्वार उभारणी व दुरूस्ती उपविभाग क्र.४ उमरेड |
| ५ | ५०/२०२१ | श्री. खामकर प्रविण कृष्णात | इमाव | इमाव | मुख्य अभियंता (यांत्रिकी), जलसंपदा विभाग, नाशिक अंतर्गत छत्रपती संभाजीनगर महसूल विभागातील अधीक्षक अभियंता,यांत्रिकी मंडळ, नांदेड अंतर्गत कार्यकारी अभियंता, मुख्य व्दार उभारणी पथक क्र. ४ छत्रपती संभाजीनगर अंतर्गत उपअभियंता, व्दार उभारणी उपविभाग क्र.४ (ब) , केसापुरी माजलगाव, |
| ६ | ६४/२०२१ | श्रीमती पिंपळकर दर्शना उत्तमराव | इमाव महिला | इमाव महिला | मुख्य अभियंता (यांत्रिकी), जलसंपदा विभाग, नाशिक अंतर्गत अमरावती महसूल विभागातील अधीक्षक अभियंता,यांत्रिकी मंडळ,नागपूर अंतर्गत कार्यकारी अभियंता यांत्रिकी विभाग,अमरावती अंतर्गत उपअभियंता,यांत्रिकी भांडार उपविभाग क्र १ , अमरावती |

ANIL VITTHAL DEOKATE

Digitally signed by ANIL VITTHAL DEOKATE
DN: CN = ANIL VITTHAL DEOKATE, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = WATER RESOURCES DEPARTMENT
Date: 2024.06.10 18:02:05 +05'30'

(अनिल वि.देवकाते)

उप सचिव, महाराष्ट्र शासन